मत्ता व दायित्वे यांची वार्षिक विवरणे सादर करणे.
मुदतवाढ देण्यासंबंधी.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक- वशिअ- १९२०/प्र.क्र.२७/११**
**मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक- ११ मे, २०२०**

वाचा:- (१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:वशिअ- १२१४/प्र.क्र.२६/११, दिनांक २ जून, २०१४
(२) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:वशिअ- १२१४/प्र.क्र.५१ (२)/ ११, दिनांक १७ नोव्हेंबर, २०१४

## शासन निर्णय

राज्य शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांनी त्यांची मत्ता व दायित्वाची विवरणे दरवर्षी सादर करावीत अशी तरतूद वरील (१) येथील आदेशान्वये विहित करण्यात आली आहे. त्यानुसार, कर्मचाऱ्यांनी दरवर्षाच्या दिनांक ३१ मार्च रोजीच्या स्थितीस अनुसरून त्यांची मत्ता व दायित्वाची विवरणे त्या वर्षीच्या ३१ मे पर्यंत विहित प्राधिकरणास सादर करावयाची आहेत. राज्य शासनाच्या वेगवेगळ्या प्रशासकीय विभागांच्या अखत्यारितील सर्व निमशासकीय संस्था, पंचायत राज संस्था , महानगरपालिका, नगरपरिषदा, नगर पंचायती , सांविधिक संस्था, सार्वजनिक उपक्रम, महामंडळे, मंडळे यांनाही सदर तरतुदी वरील (२) येथील आदेशान्वये लागू करण्यात आल्या आहेत.

२. सध्या राज्यामध्ये कोरोना (COVID १९) विषाणू संसर्गाने पसरला आहे. या विषाणूचा आणखी प्रसार रोखण्यासाठी राज्यामध्ये लॉकडाऊनही घोषित करण्यात आले आहे. कोरोना विषाणूच्या संसर्गास प्रतिबंध करण्याच्या उपाययोजना करणे, नागरिकांना वैद्यकीय मदत उपलब्ध करुन देणे, कायदा व सुव्यवस्थेची परिस्थिती हाताळणे, नागरिकांना जीवनावश्यक वस्तुंची उपलब्धता सुनिश्चित करणे अशा वेगवेगळ्या कामांमध्ये प्रशासनिक यंत्रणा व्यस्त आहे. या विषाणूचा प्रसार शासकीय कार्यालयांमध्ये होऊ नये आणि अधिकारी /कर्मचारी यांना त्याचा संसर्ग होऊ नये यासाठी कर्मचाऱ्यांच्या कार्यालयीन उपस्थितीवरही मर्यादा घालण्यात आल्या आहेत. त्यामुळे वरील आदेशांन्वये विहित केलेल्या कालमर्यादेत मत्ता व दायित्वाची विवरणे सादर करणे शक्य होणार नाही.

३. ही परिस्थिती विचारात घेऊन, वरील आदेशांन्वये दर वर्षाची मत्ता व दायित्वाची नियतकालिक विवरणे सादर करण्यासाठी विहित केलेली दिनांक ३१ मे पर्यंतची कालमर्यादा या वर्षापुरती एक विशेष बाब म्हणून शिथिल करण्यात येत आहे. राज्य शासकीय अधिकारी /कर्मचारी व वरील आदेश लागू असलेल्या अन्य सर्व संस्थांमधील अधिकारी/कर्मचाऱ्यांनी मार्च, २०२० च्या स्थितीस अनुसरून त्यांचे मत्ता व दायित्वाचे विवरण विहित प्राधिकरणांस दिनांक ३१ ऑगस्ट, २०२० पर्यंत सादर करावे असे या आदेशान्वये कळविण्यात येत आहे.

तसेच, सेवेत प्रथम नियुक्त झालेले अधिकारी /कर्मचारी, त्यांचा सेवेचा पहिल्या दोन महिन्यांचा कालावधी हा राज्यातील लॉकडाऊन सुरू झाल्यानंतर पूर्ण होत असल्यास त्यांच्या प्रथम नियुक्तीच्या वेळेच्या स्थितीस अनुसरून मत्ता व दायित्वाचे पहिले विवरण विहित कालावधीत सादर करु शकले नाहीत वा शकत नाहीत अशी प्रकरणे असल्यास, अशा अधिकारी /कर्मचाऱ्यांनाही त्यांच्या प्रथम नियुक्तीच्या वेळेच्या स्थितीस अनुसरून द्यावयाचे मत्ता व दायित्वाचे विवरण दिनांक ३१ ऑगस्ट, २०२० पर्यंत सादर करण्याची मुभा असेल.

सदर आदेश शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०२००५१११४३४१४७३०७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gupte Sanju Kamlakar

Digitally signed by Gupte Sanju Kamlakar
Date: 2020.05.11 15:15:24 +05'30'

**(संजू क. गुप्ते)**
**अवर सचिव**
**सामान्य प्रशासन विभाग**

**प्रति,**

१. राज्यपालांचे सचिव,
२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा
५. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
७. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८. सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
९. *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
१०.*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
११.*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१२.*सचिव, महाराष्ट्र विधानसभा सचिवालय, मुंबई,
१३. *सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई,
१४. *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१५. *आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,

१६.सर्व मंत्रालयीन विभाग,

मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व निमशासकीय संस्था, पंचायतराज संस्था, महानगरपालिका, नगरपरिषद, नगरपंचायती, सांविधिक संस्था, सार्वजनिक उपक्रम, महामंडळे, मंडळे यांच्या निदेर्शनास वरील आदेश आणावेत.

१७.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती),

१८. विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती),

१९.सर्व विधीमंडळ सदस्य,

२०.सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,

२१.निवडनस्ती

*पत्राने